**आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये महानिर्मितीच्या भुसावळ १x६६० मे. वॅ. प्रकल्पासाठीचे भागभांडवल के.एफ.डब्ल्यू. जर्मन बँकेकडील सौर प्रकल्पांच्या कर्ज परतफेडीशी समायोजनाने वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. सौरप्र-२०२१/प्र.क.१५७ (भुसावळ)/ऊर्जा-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक -: ०४ मार्च, २०२२

संदर्भ :-१) शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.प्रकल्प-२०१०/प्र.क्र.३/उर्जा-४ दि.५.१०.२०१०
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१
४) शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.प्रकल्प-२०१०/प्र.क्र.३/उर्जा-४ दि. ०९.१०.२०१९
५) शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.प्रकल्प-२०१०/प्र.क्र.३/उर्जा-४ दि.३१ मार्च, २०२०
६) शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०११/प्र.क्र.१५७/उर्जा-७ दि.२९.११.२०२१
७) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक/महानिर्मिती/१२६९१, दि. २४.१२.२०२१ चा प्रस्ताव
८) शा.शु. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०११/प्र.क्र.१५७/उर्जा-७ दि.३१.१२.२०२१

प्रस्तावना :-

भुसावळ औष्णिक बदली प्रकल्पाच्या रु. ४२९०.०० कोटी खर्चापैकी महानिर्मितीचा वाटा रु. ३४२२.०० कोटी असून शासनाचे २०% भागभांडवल रु. ८५८.०० कोटी इतके मंजूर करण्यात आले आहे. प्रकल्पाच्या झालेल्या कामाच्या अनुषंगाने रु. २५९.२५ कोटी रक्कम समायोजनाने वितरणास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार रु. २५९.२५ कोटी रक्कम दिनांक २९.११.२०२१ च्या शासन निर्णयान्वये महानिर्मिती कंपनीला समायोजनाने वितरीत करण्यात आली आहे. सदर प्रकल्पावर आतापर्यंत रु. २६०८.१५ कोटी खर्च झाला असून त्यामध्ये शासन भागभांडवल हिस्सा रु. ५२१.६३ कोटी आहे. त्यापैकी आतापर्यंत रु. ४२०.३५ कोटी वितरीत करण्यात आले असून आता रु. १०१.२८ कोटी भागभांडवल हिस्सा देय ठरला आहे.

२. महानिर्मितीकडून बाह्य सहाय्यीत स्त्रोतांतर्गत के. एफ. डब्ल्यू. जर्मनी यांचेकडून सौर प्रकल्पांसाठी कर्ज घेण्यात आले आहे. सदर कर्जाची मुद्दलाची परतफेडीची जुलै, २०२१ अखेरची रक्कम रु. ५६१.१७ कोटी रक्कमेचा समावेश आहे. यापैकी रुपये २५९.२५ कोटी रक्कमेचे समायोजन करण्यात आले असून आता परतफेडीच्या उर्वरित रु. ३०१.९२ कोटी रक्कमेमधून के. एफ. डब्ल्यू. जर्मनी यांचेकडून सौर प्रकल्पांसाठी घेण्यात आलेल्या कर्जाच्या परतफेडीच्या रक्कमेशी आता समायोजनासाठी मंजूर रक्कम रुपये १०१.२८ कोटी पुस्तकी समायोजनाने वितरीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

भुसावळ औष्णिक विद्युत प्रकल्पामध्ये राज्य शासनाची भांडवली गुंतवणुक म्हणून रु.१०१,२८,००,०००/- (रु.एकशे एक कोटी अठ्ठावीस लाख फक्त) इतकी रक्कम पुस्तकी समायोजनेद्वारे वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबीचा खर्च "मागणी क्र.के-११ मुख्यलेखाशिर्ष ४८०१ वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च ०२ औष्णिक विद्युत निर्मिती, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०८) महाराष्ट्र विद्युत निर्मिती कंपनीस भाग भांडवली (कार्यक्रम) (४८०१४०८६) ५४ गुंतणुका" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या रु. ५००.०० कोटी तरतूदीमधुन समायोजित करण्यात यावा. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई/नागपूर यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात यावे.

३. वरील मंजूर झालेल्या भागभांडवलाची संपुर्ण रक्कम महाराष्ट्र राज्य निर्मिती कंपनी मर्यादीत यांना रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे शासनाच्या ऊर्जा विभागास के. एफ. डब्ल्यू. जर्मनी यांचेकडून महानिर्मिती कंपनीकडील सौर प्रकल्पांसाठी घेण्यात आलेल्या कर्जाच्या मुद्दलाची परतफेडीची जुलै, २०२१ अखेरची रक्कम रु. ५६१.१७ कोटीपैकी रक्कम रुपये १०१.२८ कोटी रक्कमेशी खाली नमूद केलेल्या जमा लेखाशिर्षाखाली समायोजनेद्वारे जमा करण्यात यावी.

| अ.क्र. | खर्चाचा तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १ | "मागणी क्र.के-११ मुख्यलेखाशिर्ष ४८०१ वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च ०२ औष्णिक विद्युत निर्मिती, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००) (०८) महाराष्ट्र विद्युत निर्मिती कंपनीस भाग भांडवली (कार्यक्रम) (४८०१४०८६) ५४ गुंतवणुका" | १०१,२८,००,००० | ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, १९० सार्वजनिक क्षेत्रे व इतर उपक्रम यांना कर्जे (००) (०२) महा. जनको कंपनीस सौर ऊर्जा प्रकल्पासाठी कर्जे लेखाशिर्ष ६८०१५१४८ खाली समायोजित करावयाची रक्कम |
| | **एकूण** | **१०१,२८,००,०००** | |

५. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई/नागपूर यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येवू नये.

६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र- १/२ यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात रु.१०१,२८,००,०००/- (रु.एकशे एक कोटी अठ्ठावीस लाख फक्त) चे पुस्तकी समायोजन करून शासनास तसे कळवावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. ३६/२०२२/व्यय-१६, दिनांक २५.०२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत असून तो शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयाचा सांकेतांक क्र. २०२२०३०४१२४९२१७०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1ED E1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.03.04 12:50:50 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित, हाँगकाँग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.
२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या., प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, विधान भवन, मुंबई
४) महालेखापाल (लेखा परिक्षा /लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

५) महालेखापाल (लेखा परिक्षा /लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
८) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
९) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१४ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१०) अवर सचिव (ऊर्जा-४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
११) निवडनस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.